राज्य योजना सन २०२२-२३
वन्यप्राणी अपंगालयाची स्थापना (२४०६ २२३२)
अंतर्गत चालू बाब प्रस्ताव.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र. डब्ल्यूएलपी- ०५.२२/प्र.क्र.१३०/फ-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १६ मार्च, २०२३.

वाचा :-

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपुर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र. ११/(२२-२३)/६६५/२०२२-२३, दिनांक २५.०१.२०२३.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपुर यांचे पत्र क्रमांक :- कक्ष-१/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र. ११/(२२-२३)/८२७/२०२२-२३, दिनांक ०६.०३.२०२३.

**प्रस्तावना :-**

सन २०२२-२३ आर्थिक वर्षाकरिता वन्यप्राणी अपंगालयाची स्थापना (२४०६ २२३२) या लेखाशिर्षाअंतर्गत एकूण रु. ८७००.०० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पित करुन दिलेला आहे.

२. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ चे परिपत्रकान्वये महाराष्ट्र विनियोजन अधिनियम, २०२२ ला अनुसरुन सन २०२२-२३ या आर्थिक निधी वितरणाच्या अनुषंगाने मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत.

३. संदर्भ क्रमांक २ व ३ च्या पत्रान्वये सन २०२२-२३ करीता प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वन्यप्राणी अपंगालयाची स्थापना (२४०६ २२३२) या योजनेतंर्गत रू. ५३८५.१६ लक्षचे प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केले आहेत. त्या अनुषंगाने शासनाने पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

वित्त विभागाचे संदर्भ क्रमांक १ परिपत्रक विचारात घेता प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्रमांक २ व ३ च्या पत्रान्वये केलेली निधीची मागणी लक्षात घेऊन वन्यप्राणी अपंगालयाची स्थापना (२४०६ २२३२) या लेखाशिर्षांतर्गत अर्थसंकल्प निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेल्या निधीच्या मर्यादेत **रु. १३४२.७० लक्ष** इतका निधी सोबत जोडलेल्या विवरणपत्रानुसार खालील अटी व शर्तींचे अधिन राहून वितरीत करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:

i. सदर योजनेवर होणारा खर्च सन २०२२-२३ मध्ये लेखाशिर्ष क्रमांक २४०६ वनीकरण व वन्यजीवन, ०२ पर्यावरणीय वनीकरण व वन्यजीवन, ११० वन्यजीव, पंचवार्षिक योजनाअंतर्गत, राज्य योजनांतर्गत योजना (००) (१०) वन्यप्राणी अपंगालयाची स्थापना (२४०६ २२३२) अंतर्गत उद्दिष्टनिहाय, अर्थसंकल्प वितरण प्रणालीव्दारे प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावा.

ii. योजनांतर्गत प्रस्तावीत कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी प्रशासकीय व तांत्रिक मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

iii. शासन मान्यतेसाठी सादर केलेल्या प्रस्तावातील कार्यबाबींवर वन्यप्राणी अपंगालयाची स्थापना (२४०६ २२३२) या योजने व्यतिरीक्त इतर योजनेमधून निधी खर्च होणार नाही याची कृपया दक्षता घ्यावी.

iv. सदर कामे करताना भारतीय वन अधिनियम, १९२७, वन्यजीव (संरक्षण ) अधिनियम, १९७२ व वन (संवर्धन) अधिनियम, १९८० तसेच राष्ट्रीय प्राणी संग्रहायलयाच्या मार्गदर्शक तत्वांचा भंग होणार नाही व आवश्यक ती परवानगी घेतली गेली आहे ह्याची दक्षता घ्यावी.

v. प्रस्तावात नमूद ज्या कामांना सक्षम प्राधिकाऱ्यांची प्रशासकीय मंजूरी मिळाली आहे त्यावरच वितरीत अनुदान खर्च होईल याची खातरजमा करण्यात यावी.

vi. वितरीत केलेला निधी शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार योजनेत विहीत केलेल्या मर्यादेत, प्रचलित नियमांच्या अधीन राहून, प्रचलित धोरण व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

vii. प्रस्तावित असलेल्या बांधकामासाठी शासनाने दिलेल्या सूचना आणि विहीत केलेली कार्यपद्धती अनुसरण्याची संबंधीत नियंत्रक/अंमलबजावणी अधिकारी यांची राहील. कोणत्याही प्रकारची वित्तीय अनियमितता होऊ न देण्याचीही जबाबदारी त्यांची असेल.

viii. कार्यबाबींमध्ये खरेदीचा समावेश असल्यास शासनाने विहित केलेल्या पध्दतीचा अवलंब करुन खरेदी करण्यात यावी.

ix. सदर योजनेच्या अनुषंगाने विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वे व वित्त विभागाने वेळोवेळी विहीत केलेल्या मार्गदर्शक तत्त्वानुसार प्रस्तावात नमूद केलेल्या कार्यबाबींच्या अनुषंगाने खर्च करण्यात यावा.

x. वित्त विभागाने निर्गमित केलेल्या विविध मार्गदर्शन सूचनांचे व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२ चे काटेकोर पालन करावे.

२. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक :- अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक ०४.०४.२०२२ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३१६१५५७५९२७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5712CE2D7A095C22E97EBB8F03C668B12EBA1DB0DD8E284883B7BD7FA74DA65D, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2023.03.16 16:03:04 +05'30'

**( सिध्देश सावर्डेकर )**
विशेष कार्य अधिकारी
महसूल व वन विभाग

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), पूर्व नागपूर.
५. मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), नागपूर / पूणे / चंद्रपूर.
६. वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक, ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर.
७. वनसंरक्षक (प्रादेशिक) यवतमाळ.
८. उपवनसंरक्षक (प्रादेशिक), जुन्नर / ब्रम्हपूरी / अमरावती / बुलढाणा/ वडसा / नागपूर.
९. उपवनसंरक्षक मध्य चांदा, चंद्रपूर.
१०. उपसंचालक, सह्याद्री व्याघ्र प्रकल्प, कोल्हापूर.

११. विभागीय वन अधिकारी, चंद्रपूर.
१२. उप विभागीय वन अधिकारी, चांदोली राष्ट्रीय उद्यान, कोल्हापूर.
१३. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरिक्षण), मुंबई/नागपूर.
१४. ब-१, फ-२,फ-१ कार्यासन (निवडनस्ती), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

*******

शासन निर्णय क्रमांक :- डब्ल्युएलपी ०५.२२/प्र.क्र. १३०/फ-१, दिनांक :- १६ मार्च, २०२३ सोबतचे विवरणपत्र.

(रक्कम रु. लाखात)

| अ.क्र. | तपशिल | प्र.मु.व.सं. यांनी सादर केलेल्या प्रस्तावाची रक्कम | प्रस्तावातील वगळलेली बाब क्रमांक | मंजूरीची रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | वनसंरक्षक, ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प, चंद्रपूर | १५१.६७ | -- | १५१.६७ |
| २ | उपवनसंरक्षक (प्रादेशिक), जुन्नर | १०८.२८ | -- | १०८.२८ |
| ३ | उपवनसंरक्षक (प्रादेशि), ब्रम्हपुरी | १२.०० | -- | १२.०० |
| ४ | उपवनसंरक्षक मध्य चांदा, चंद्रपूर | १२६.०० | अ.क. ४ व ५ | १०२.०० |
| ५ | उपवनसंरक्षक (प्रादेशिक), अमरावती | २८.५३ | अ.क. ४, ९ व १६ | २७.९३ |
| ६ | उपवनसंरक्षक (प्रादेशिक), बुलढाणा | ५.७० | -- | ५.७० |
| ७ | उपविभागीय वन अधिकरी, चांदोली राष्ट्रीय उद्यान | २८.७० | अ.क. २० व २६ | २६.०० |
| ८ | उपसंचालक, सह्याद्री व्याघ्र प्रक्रल्प | १९.८९ | -- | १४.५१ |
| ९ | विभागीय वन अधिकारी, चंद्रपूर | २८८.०६ | अ.क. ४ व २५ | २५३.६८ |
| १० | विभागीय वन अधिकारी,चंद्रपूर | १३७.०० | अ.क. ७, ९ व १० | २२.०० |
| ११ | उपवनसंरक्षक (प्रादेशिक), ब्रम्हपुरी | ४०६.५० | अ.क. २१,२२, ३२ ते ३६, ४९, ५३, ६१ ते ६६ | २९४.३० |
| १२ | उपवनसंरक्षक (प्रादेशिक), वडसा | ४९८.६० | अ.क. १,२ ४ ते १० | ११६.६० |
| १३ | उपवनसंरक्षक (वन्यजीव), नाशिक | ११०.६८ | अ.क. १२ | १०७.६८ |
| १४ | उपवनसंरक्षक (प्रादेशिक), नागपूर | १६७.८२ | अ.क्र. १ ते ९, १२ | १००.३५ |
| | **एकूण** | **२०८९.४३** | | **१३४२.७०** |

*******